आणखी काही अजब पुस्तके

---

विंदा करंदीकर

- राणीची बाग
- सर्कसवाला

वसंत बापट

- बालगोविंद

भा. रा. भागवत

- झपाटलेला प्रवासी
- खजिन्याच्या बेटावर संजू राजू

रमेश मंत्री

- संजीवचा वाढदिवस

श्री. बा. रानडे

- बोवडकांदा

---

किंमत : रु. १२--००



पॉप्युलर प्रकाशन
म ३६०

विंदा करंदीकर

अजबखाना

AJABKHANA
(Children's Poems)
Vinda Karandikar

पॉप्युलर प्रकाशन

म–३६०



पहिली आवृत्ती : १९७४/१८९५
दुसरी आवृत्ती : १९८६/१९०८

**प्रकाशक :**
रामदास भटकळ
पॉप्युलर प्रकाशन प्रा.लि.
३५ सी, पं. मालवीय मार्ग
ताडदेव, मुंबई ४०० ०३४

**मुद्रक :**
मनमोहन भटकळ
पॉप्युलर बुक डेपो प्रिंटिंग डिव्हिजन
डॉ. भडकमकर मार्ग
मुंबई ४०० ००७.

**बालमित्रांनो,** हा ' अजबखाना ' तुमच्या भेटीला आणतांना मला फार आनंद होत आहे. तुम्हाला बालकविता फार आवडतात. आम्ही प्रसिद्ध केलेली कवि विंदा करंदीकरांची ' राणीची बाग ' हे तर तुमचे सर्वांत आवडते पुस्तक. विंदांच्या बालकविता आणि सरवटे यांची चित्रे; मग काय एकदम धमाल. आता ते पुस्तक बाजारात मिळतसुद्धा नाही. पण महागाईचे दिवस. चित्रांसह पुस्तक छापायचे म्हणजे किंमत फार वाढते. ती पालकांना परवडत नाही, आणि तुम्हाला तर विंदांच्या बालकविता हव्याच हव्या.

या अजबखान्यामध्ये मी तुम्हाला विंदांची सात पुस्तके एकत्र देत आहे. त्यात तुम्हाला ' राणीची बाग ' मधील कविता तर मिळतीलच, पण त्याचबरोबर ' एकदा काय झालें ', ' सशाचे कान ', ' एटू लोकांचा देश ', ' परी ग परी ', ' टॉप ' व ' सात एके सात ' या सर्व पुस्तकांतील कविता एकत्र वाचायला मिळतील. ' टॉप ' आणि ' सात एके सात ' ही तर तुम्ही अजून पाहिलेलीच नाहीत.

पुस्तक वाचलेत की या पुस्तकाला ' अजबखाना ' हेच नाव योग्य आहे असे तुमचेही मत होईल. विंदांनी अनेक प्रकारच्या बालकविता लिहिलेल्या आहेत. कधी ते तुमच्या आसपासच्या वस्तूंतूनच एक अद्भूत वातावरण निर्माण करतात, कधी कल्पनेची भरारी मारून ते तुम्हाला आपल्याबरोबरच एका वेगळ्याच मुलखात घेऊन जातात. कधी ते भावनांना झोके देतात, कधी पोट फुटेतो हसवतात, कधी गमतीने चिमटे काढतात, कधीकधी नुसती मस्त मजा करतात. एकाच पुस्तकात हे सर्व मिळणे म्हणजे

खरोखरच 'अजब'. आमच्या वेळेला अशी पुस्तके असती तर!

'अजबखाना' तुम्हाला तर आवडेलच, पण तुमच्या घरातल्या लहानथोर सगळ्याच मंडळींना तो वाचावासा वाटेल. शाळेत नेलात तर शिक्षकसुद्धा हे पुस्तक तुमच्या हातांतून काढून घेतील आणि स्वतः वाचीत बसतील! कारण विंदांच्या बालकवितांची तीच तर मजा आहे. त्या सर्वांनाच आवडू शकतात. म्हणून या पुस्तकाला तुम्हाला फारच जपावे लागेल.

पॉप्युलर प्रकाशन
२६ जानेवारी १९७४

तुमचा,
**रामदास भटकळ**

# अनुक्रमणिका

१

## राणीची बाग

स्वप्नांत पाहिली
राणीची बाग;
हत्तीच्या पाठीवर
बसला नाग.

हरणांच्या बरोबर
खेळत पत्ते
बसले होते
दोन चित्ते.

माकड होतें
सांगत पुराण;
उंट होता
वाचीत कुराण.

सिंह होता
व्याख्यान देत;
गाढव होतें
उतरून घेत.

जिराफ होता
गात छान :
मानेइतकीच
लांब तान.

कोल्हा होता
दुकानदार;
त्याच्या दुधांत
पाणी फार.

मला पाहातांच
म्हणाले सारे,
“ एक पिंजरा
याला द्यारे. ”

त्याबरोबर
आली जाग;
स्वप्नांत पाहिली
राणीची बाग.



२

## आटपाट नगरामध्यें

आटपाट नगरामध्यें
नाहीं होत चोरी;
हुशार मुलें काळीं; आणि
खुळीं मुलें गोरीं.

आटपाट नगरामध्यें
किती किती मजा !
प्रधान भरतो पाणी; आणि
रस्ते झाडतो राजा.

आटपाट नगरामध्यें
नाहीं चालत नाणीं;
एक शेर गुळासाठीं
दहा-बारा गाणीं !

आटपाट नगरामध्यें
सुटी नाहीं, बाळा,
सांग कशी सुटी असेल,
जर नाहीं शाळा ?

३

## मावशी

सोलापूरहून
येते काकू;
माझ्यासाठीं
आणते चाकू.

कोल्हापूरहून
येते आत्ते;
माझ्यासाठी
आणते पत्ते.

राजापूरहून
मावशी येते;
माझा एक
पाप्पा घेते !



४

## परी ग परी

'परी ग परी
कोण तुझ्या घरीं ?'
"मनी मांजरी स्वैपाक करी"

'परी ग परी
कोण तुझ्या घरीं ?'
"उंदीर खातो श्रीखंड-पुरी."

'परी ग परी
कोण तुझ्या घरीं ?'
"पोपट म्हणतो, 'हरी, हरी'."

'परी ग परी
येऊ का घरीं ?'
"दारांत विंचू पहारा करी !"

५

## टोक न मोडण्याचा मंत्र

तीन सालें शाळेची;
तीन सालें वेळेची;
तीन सालें चाकूची;
तीन सालें डाकूची.
तीन चोक तेरा,
एक चाकू मारा.
डाकू, डाकू, डाकू,
धारवाला चाकू;
पोलादाचें पान;
टोक झाली छान.



६

## कावळ्याचे बेत

कावळ्यानें केलें
आपलें लगीन;
हुंडा मिळाला
रुपये तीन.

एका रुपयाचें
आणलेन् कापड;
एका रुपयाचे
घेतलेन् पापड.

आणि म्हणाला,
“जमलें तर
एका रुपयात
बांधीन घर!”

७

## बेडूक नांवाचा विद्यार्थी

एक मुलगा गेला
तळ्याच्या कांठीं;
विसरला पुस्तक,
विसरला पाटी.

तळ्यांत होता बेडूक
त्यानें पोशाख केला;
पाटी-पुस्तक घेऊन
शाळेमध्यें गेला.

मास्तरांनीं घातलीं
तोंडांत बोटें :
एवढ्याशा पोराचें
डोकें किती मोठें !

तालीममास्तर म्हणाले,
" भलतीच तयारी !
पोहण्यामध्यें आहे
सगळ्यांनाच भारी. "

संस्कृतच्या मास्तरांचा
तास झाला सुरू;
बेडूक लागला मधेंमधें
डराव्-डुरुक् करूं.



वर्गांत होती मुलें
कमीत कमी शंभर;
पण बेडकाचाच आला
पहिला नंबर.

८

## माकडाचें दुकान

एका माकडानें
काढलें दुकान;
आलीं गिऱ्हाइकें
छान, छान.

मनीनें आणले
पैसे नवे,
म्हणाली, "शेटजी,
उंदीर हवे."

गरुड म्हणाला
घेऊन झाप,
"दोन रुपयाचे
काढा साप."

अस्वल आलें
नाचवीत पाय,
म्हणालें, "मधाचा
भाव काय?"

कोल्ह्यानें मागितला
गुळाचा रवा;
आणि म्हणाला,
"मांडून ठेवा!"



माकड म्हणालें
लावून गंध,
"आतां झालें
दुकान बंद."

## चार शहाणे

माकडानें घातलीं
छत्रीएवढी हॅट;
म्हणालें, " मी हॉलंडचा
डॉक्टर व्हॉन वॅट. "

कोल्होबानें घातली
पगडी लालेलाल;
म्हणाला, " मी काशीचा
पंडित वन्सीलाल."

लांडग्यानें चढवली
गोंडेवाली फेझ;
म्हणाला, " मी मक्केचा
शेख इमाम बेझ. "

चिंचेवरच्या घुबडानें
त्यांचा ओढला पाय;
म्हणालें, " पण शेपट्यांचें
करणार काय ? "





## भीमाचें जेवण

बकासुर ओरडला,
' अलऌ डुर्र ';
भीमानें मारला
भुरका... ' भुर्र '

बकासुरानें
मारली थप्पड,
भीम म्हणाला,
" लोणचें फक्कड ! "

बकासुरानें
हाणला ठोसा;
भीम म्हणाला,
" इडली–दोसा. "

बकासुरानें
बुकलली मान;
भीम म्हणाला,
" चटणी छान ! "

बकासुरानें
हाणली ठोकर;
भीमानें दिली
एक ढेकर !

बकासुरानें
मारली गदा;
भीम हसला
खदा खदा !

बकासुराला
घाम फुटला;
तेव्हां भीम
जेवून उठला.



११

## चिमण्ये, तुझें वजन किती ?

चिमण्ये, तुझें वजन किती ?
" चार माणकें, चाळीस मोती. "

कावळ्या, तुझें आजोळ कुठें ?
" जिथें मिळतात तीन तिठे. "

कोंबड्या, तुऱ्याची किंमत काय ?
" दोन हात, दोन पाय. "

मोरा, नाच शिकलास कसा ?
" असा; असा; असा; असा. "

१२

## मैफल

एक झुरळ
रेडिओंत गेलें;
गवयी होऊन
बाहेर आलें.

एक उंदीर
तबल्यांत दडला;
तबलजी होऊन
बाहेर पडला.

त्या दोघांचे
गाणें झालें
तिकीट काढून
मांजर आलें !



१३

## भोवऱ्याचें गाणें

भिरभिर भोवऱ्या
भीर भीर,
एका पायावर
फीर फीर.

गुंगुन गुंगुन
गाणें म्हण;
नको हालूं
एक कण.

सात दिवस
फिरत राहा;
सात देश
इथून पाहा.

भिरभिर भोवऱ्या
भीर भीर,
भोवळ आली तर
पाजीन खीर !

१४

## पतंग आणि ठेंगू

एकदां एका मुलाचा
पतंग गुल् झाला;
ठेंगूंच्या देशामध्यें
उडत उडत गेला.

ठेंगूंच्या देशामधला
आंगठ्याएवढा पोर;
त्यानें मांजा पकडला
लावून सगळा जोर.

ठेंगूंच्या देशामध्यें
चमत्कार झाला :
पतंगाच्या बरोबर
ठेंगू उडून गेला !



१५

## जादूचें जंगल

आफ्रिकेच्या जंगलामध्यें
नाचणारें झाड !
माडाएवढी तुळस
आणि तुळशीएवढे माड.

तुळशीएवढ्या माडावर
मांजराएवढी खार;
तिच्या मऊ पाठीवरती
ठेंगू होतो स्वार.

ठेंगू खातो खोबरें
आणि खार पिते पाणी;
आफ्रिकेच्या जंगलामध्यें
झाडें म्हणतात गाणीं !

१६

## कुंभकर्ण

कुंभकर्णाला
झोप आली;
डोंगर घेतलान्
उशाखालीं.

वादळांनी त्याला
घातला वारा
तरी घामाच्या
सुटल्या धारा.

त्यांतून निघाले
नदी-नाले;
—किती लोक
बुडून मेले !

रावणानें डागली
नाकांत तोफ;
तेव्हां उडाली
त्याची झोप.

कुंभकर्ण म्हणाला,
" बहार झाली !
स्वप्नांत पुन्हा
झोपच आली !"



१७

## दीपावळ

### परीची करामत

अनाराच्या झाडावर
एक परी चढली;
सात वेळां पडली;
तरी नाय रडली.

तिचें सगळ्या परींनीं
कौतुक केलें फार.
फुलबाजांच्या फुलांचा
गळ्यांत घातला हार.

### चिक्कणकाकूच्या करंज्या

दिवाळींतल्या करंज्या
शिमग्याच्या साठीं
चिक्कणकाकूनें ठेवल्या
देव्हाऱ्याच्या पाठीं.

पण त्या करंज्यांच्या
चिमण्या झाल्या छान;
डबा उघडून गेल्या
शोधित माथेरान.

### लाडवांचा किल्ला

दिवाळींत आम्हीं बांधला
लाडवांचा किल्ला;
रात्री त्यावर केला
कुणी तरी हल्ला.

सगळे लोक म्हणाले,
" मुलें सांगतात खोटें. "
पण भलंभटाचें पोट
झालें दुप्पट मोठें !

### शिंदेशाही विनोद

शिंदेकाका आणतात
एव्हढा खाऊचा पुडा;
आणि मग शिंकतात
धडा, धडा, धडा.

काकांच्या शिंकण्याला
मुळी नाहीं ताळ,
म्हणतात, " माझ्या नाकांत
आहे फटाक्याची माळ !"

## पणत्या

पणती लावा
पुढच्या दारा;
पाव्हणा येईल;
गोरा, गोरा !

पणती लावा
मागच्या दारी;
नाहीं होणार
कधीं चोरी.

पणती लावा
तुळशीपाशीं;
धनधान्याच्या
पडतील राशी.

पणती लावा
खिडकीमधेंच;
नाहींतर मनीला
लागेल ठेच.

अंगणांत लावा
पणत्या साठ;
वाटसरूंना
दिसेल वाट !



१८

## सुटी मिळण्याचा मंत्र

कोणीतरी आलें; कोणीतरी गेलें;
कोणीतरी कुठेंतरी कायतरी केलें;

तीन त्रिक नऊ
तांदळांत गहू ;

तीन टोले आल्याचे .... ठण् ठण् ठण्
तीन टोले गेल्याचे .... ठण् ठण् ठण्

पाटीवरती शेरा;
तीन चोक तेरा;
असें कसें झालें ?

कोणींतरी कायतरी कुठेंतरी केलें;
दारामधून आलें आणि खिडकीमधून गेलें.

१९

## बाताराम

एवढासा बाताराम
मारतो किती बाता !
म्हणतो, "या मुंबईत
हिटलर आला होता."

एवढासा बाताराम
बोलतो किती खोटें !
म्हणतो, "होतीं श्रीकृष्णाला
एकशेंआठ बोटें."

एवढासा बाताराम
म्हणतो कसा, "नंद्या,
मींच माझ्या आजोबांना
शिकवली संध्या !"



२०

## खुर्ची आणि स्टूल

खुर्ची म्हणाली,
"अरे स्टुला,
केव्हां येणार
चालायला तुला ?"

स्टूल म्हणालें,
"त्याच वेळीं
जेव्हा हातानें
वाजवशील टाळी !"

— हें ऐकून
पंखा हसला;
पाय नसून
फिरत बसला.

२१

## आजी

कोकणांतली आजी
घाटावर आली;
कृष्णेच्या पुरांत
वाहून गेली !

वाहतां वाहतां
म्हातारी हसली,
मळींतलीं वांगीं
डोळ्यांना दिसलीं.

म्हातारी लागली
हालवायला पाय,
म्हणाली, "हीं खाल्ल्याशिवाय
मरतें कीं काय ?"

२२

## गोगलगाय

गुणी गुणी
गोगलगाय
देवान् दिले
पोटांत पाय !

चालते कशी
हळूहळू,
प्रत्येक पायाला
झालें गळू !

मुळू मुळू
चालते अशी
हिला भूक
लागेल कशी ?

जाते कुठें ?
खाते काय ?
गुणी गुणी
गोगलगाय !

२३

## राजापूरची गंगा

राजापूरच्या गंगेमध्यें
गाढवान् केलें स्नान;
कान झाले आखूड
पण लांब झाली मान !

राजापूरच्या गंगेमध्यें
उंटान् केलें स्नान;
पाठ झाली सरळ
पण लांब झाले कान !

राजापूरच्या गंगेजवळ
माकडें होतीं सात;
त्यांनीं आपला पुढें केला
दक्षणेला हात ! !



२४

## सून

एकदां कांद्याला
म्हणाली लसूण,
" मला आण
एक सून. "

मग कांदा
बाजारांत गेला
लवंग घेऊन
घरीं आला.

लसूण म्हणाली,
" सून हुषार. "
लवंग झाली
तिखट फार !

२५

## कोकणी भेट

तुझ्या आतेचा मामा
तो माझ्या काकाचा भाचा;
त्याला नेऊन दे
हा चिंचेचा ठेचा.

तुझ्या मावशीची जाऊ
ती माझ्या नणंदेची नात;
तिला नेऊन दे
हे कापे गरे सात.

मला कुठें म्हातारीला
चावताहेत पोहे;
पण घातलेनच भांड्यांत
तर खलबत्ता आहे.

२६

## सुरवंट

सुरवंटा, सुरवंटा
सांग मला;
इतकी खाज
कशी तुला ?

रोज कुयलें
खातोस का ?
खाजकोलतीवर
झोपतोस का ?

सुरवंटा, सुरवंटा,
सांग मला;
लागते का कधीं
खाज तुला ?

२७

## चिडवाचिडवी

फुलें येऊन
उपयोग काय ?
चाफ्या, तुला
नाकच नाय्
नाकच नाय् !

ढगा, पाणी
असून फुकट !
तुला कुठें
लागतें तिखट
लागतें तिखट ?

२८

## आजोबांचा कोट

आजीच्या बोचक्यांत
आजोबांचा कोट;
केवढी ही छाती !
केवढें हें पोट !

आजोबांच्या कोटाला
मानेवरतीं ठिगळ,
पितळेचीं बटणें
सगळींच डगळ.

आजोबांच्या कोटाला
तंबाखूचा वास.
आजीच्या डोळ्यांना
त्याचा होतो त्रास !

२९

## तुकाराम

म्हणतात तुकाराम
होता वाणी
त्याचा ताजवा
पाहिला का कोणी ?

गुळ, खोबरें,
मिर्ची लाल—
होता का विकीत
असलाच माल ?

त्याच्या दुकानीं
सांग भाऊ,
मुलांसाठीं
होता का खाऊ ?

## विंचू

पाठीवरती
घेऊन बिऱ्हाड
विंचू म्हणतो,
" गांठीन वऱ्हाड.

मुंबईमध्यें
घेईन तागडी,
पुण्यामध्यें
घेईन पगडी.

नागपुरामध्यें
घालीन दुकान;
दिल्लींत बांधीन
बंगला छान."

पाठीवरती
घेऊन बिऱ्हाड
विंचू म्हणतो,
" गाठीन वऱ्हाड."

....आधीं करा
विचार पुरा;
मगच चिमटींत
नांगी धरा !





## पांच बुडकुल्यांतला स्वैपाक

एका बुडकुलींत
केला भात;
जेवायला आले
भाऊ सात.

दुसऱ्या बुडकुलींत
केली भाजी;
जेवायला आली
आईची आजी.

तिसऱ्या बुडकुलींत
केली खीर;
जेवायला आले
नऊ दीर.

चवथ्या बुडकुलींत
केली कढी;
जेवायला आलीं
माणसें बडीं.

पाचव्या बुडकुलींत
वरण केलें;
सगळे देव
जेवून गेले.

" तुपांत पडली माशी
नवरा राहिला उपाशी !"....

३२

## एकदा काय झालें !

एकदा काय झालें
एकदा काय झालें
पक्षी उडून गेले
म्हणून झाड उडून गेलें.

एकदा काय झालें
एकदा काय झालें
गणपतीचा मुकुट घालून
उंदीरमामा आले.

एकदा काय झालें
एकदा काय झालें
नातवान धरला विंचू
त्याला आजोबाच भ्याले !



३३

## सशाचे कान

एकदां गाढव
सशाला हसलें,
म्हणालें, " तुझे कान
असले कसले !
हे बघ माझे
किती लांब. "
ससा म्हणाला,
" जरा थांब. "

ससा गेला
माकडाच्या कडे
म्हणाला, " देईन
सात वडे;
पण मला
युक्ती सांग :
कसे होतील
कान लांब ? "

माकड म्हणाले,
" छान, छान !
फांदीला बांधतों
तुझे कान;
आणि मग
करतों उपाय :
खालून ओढतों
तुझे पाय. "

ससा लागला
फांदीला लोंबूं,
माकड लागलें
पायाशीं झोंबूं.
माकडाला मिळाले
झोके छान;
सशाला मिळाले
गाढवाचे कान !

३४

## हत्तीची कहाणी

आकाशांतला हत्ती
जमिनीवर आला;
त्यानें लोळून लोळून
एक खड्डा केला.

पावसाचें पाणी
खड्ड्यामधें जमलें,
हळू हळू खड्ड्याचें
सुरेख तळें बनलें.

त्या तळ्यांत उगवली
कमळाची कळी;
मग हत्ती म्हणाला,
" हीच ती मुळी ! "

तळ्याच्या सभोंवतीं
हत्ती लागला झुलूं;
मग कळी लागली
हळू हळू फुलूं.

हत्तीची सोंड
कळीजवळ आली;
तोंच त्या कळीची
एक परी झाली.

हत्तीच्या पाठीवर
बसली परी;
आणि त्याला म्हणाली,
" चल आपल्या घरीं. "

फार वर्षीपूर्वी
चमत्कार झाला :
उडत उडत हत्ती
आकाशांत गेला !



३५

## गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या

गाऱ्या गाऱ्या भिंगोऱ्या !
देवाघरच्या रंगाऱ्या,
रंगव माझे रंग;
आकाशाचें भिंग
भिंगामधली भावली
रंगामागें धावली;
तिला लागली ठेच,
राजाला पडला पेच.
राजा लागला रडूं,
मरला माझा गडू.
गडू पडला खालीं;
भावली माझी न्हाली;
भिंग गेलें भंगून
दिशा गेल्या रंगून !

३६

## लपंडाव

कळीमध्यें लपतें फूल;
फुलामध्यें लपतें बीं;
बियांमध्यें लपतें झाड;
....नारळामध्यें लपतो माड.

दर्यामध्यें लपतो ढग;
ढगामध्यें लपते नदी;
नदीमध्यें लपतें पाणी;
....गळ्यामध्यें लपतात गाणीं.

या खेळाचें सांगा नांव :
' लपंडाव ! लपंडाव ! '

३७

## वेंधळ्याचे घर

वेंधळ्याच्या घरीं
भलताच न्याय :
स्टोच खातो
सगळी साय.

वेंधळ्याच्या घरची
रीतच न्यारी :
दिवेच वाचतात
पुस्तकें सारी.

वेंधळ्याच्या घरीं
सगळीच गंमत :
माणसाहून मोठी
मांजरांची हिंमत !

३८

## अजागळ अण्णा

अजागळ अण्णांच्या
बुटांत कोण ?
दोन झुरळें,
एक घोण.

अजागळ अण्णांच्या
खिशांत काय ?
उंदीर काढतो
बाहेर पाय !

अजागळ अण्णांची
टोपी कशी ?
चिमणी घरटें
बांधील अशी ।

अजागळ अण्णांच्या
हातांत पाहूं ?
मुलांच्या साठीं
मणभर खाऊ ! !

३९

## चिडवण्याचा मंत्र

हरले हप् !
बसले गप् !
कर ग आजी
मेंथ्याचि भाजी
नको ग रड्डू,
कारलें कड्डू;
फुगलें नाक,
पाठीला चाक;
पिकले केस,
तोंडाला फेस.
हळु बाई हळू;
शिजलें अळू.
हरले हप् !
बसले गप् !

४०

## उंटावरचा शहाणा

उंटावरचा एक शहाणा
सोन्याच्या घालून वहाणा
भीक मागतो दारोदारीं;
म्हणतो, " सगळे कंजुष भारी. "

उंटावरचा एक शहाणा
उंटावरुनी शेळ्या हाकी;
आतेला तो म्हणतो मामी;
अन् मामीला म्हणतो काकी !

उंटावरचा एक शहाणा
म्हणतो, " बांधिन असाच वाडा :
दारामधुनी शिरे न कुत्रा;
खिडकीमधुनी येइल घोडा ! "

४१

## कोल्होबाची सर्कस

कोल्होबानें काढली
सर्कस नवी;
सगळेच म्हणतात
" बघायला हवी. "

कासव उगाळतें
मणभर सुंठ;
सुईच्या नेढ्यांतून
जातो उंट.

सशाच्या पाठीवर
चढतो हत्ती
आणि मालवतो
चंद्राची वत्ती.

माणसाची नक्कल
करतात खेचरें;
बोलतात एक
करतात दुसरें.

सिंह करतो
सगळ्यावर कडी :
मुंगीच्या डोक्यावरून
मारतो उडी.

बेडकी फुगते
बैलाएवढी
आणि ओढते
भरलेली गाडी.

माकड करतें
विदुषकी मस्ती;
आपल्याच सावलीशीं
खेळतें कुस्ती.

कोल्होबासुद्धां
करतो काम!
दोन्ही हातांनीं
खातो बदाम.

--सर्कस जुनी;
जाहिरात नवी.
सगळेच म्हणतात,
" पहायला हवी. "



४२

## 'जर--तर'ची गंमत

आकाशाला
शिडी केली
तर चांदणी
येईल खाली.

फुलें करतील
तिचा हेवा;
म्हणतील, " हिला
दूरच ठेवा. "

पण म्हणेल
आमची ताई
" माझ्या वेणींत
बस बाई ! "

४३

## बक्षिस

उंचावरून
मारतोस उडी !
नारळा तुझी
छातीच बडी.

तिन्ही डोळे
उघडून पहा,
--तुला आवळे
देईन दहा.

जर शेंडीला
मारलीस गाठ
तुला चिंचा
देईन साठ!

४४

## दोन परी

' अग ' नि ' काग '
या दोन परी
रहात होत्या
एकाच घरीं

एकदा कागला
आली लहर
माशाच्या पाठीवर
बांधावें घर.

अग बसली
गाणें गात.
कागनें पाहिले
समुद्र सात.

तिनें आणलीं
लाख मोतीं
तरी अग
गातच होती.

काग म्हणाली
" अग बाई,
काय पण आ आ !
काय पण ई ई ! "

अगचे डोळे
पाण्यानें भरले;
कागच्या मोत्यांचे
पाणीच सरलें !



४५

## चार पायांचे झाड

एका सांबराला
राग आला;
त्याचा परिणाम
काय झाला :
शिंगांना फुटले
छत्तीस फाटे :
झाड वाढले
खूपच मोठे !

आकाशाला
लागलें घासूं;
चांदोबाला
आलें हसूं.
तो सांबराला
म्हणतो काय :
" कशाला हवे
झाडाला पाय ! "

४६

## नकटी राणी

नकट्या देशाची
नकटी राणी;
नकटा प्रधान
फार इमानी.

नकटी राणी
नाकांत हसते,
नकटी मनी
मांडीवर बसते.

तिघे मिळून
खेळतात रमी.
नकट्या नाकांत
शेंबुड कमी.

५०

## पऱ्यांचा बंगला

पऱ्यांच्या बंगल्यांत
राहते परी;
रोज तिच्यापुढें
नाचते तिरी.

गुलाम करतो
सगळें काम;
एक्या म्हणतो
" हरे राम ! "

जोकर घेतो
उलट्या उड्या,
राजा मारतो
बाता बढ्या.

राणी म्हणते,
" माझ्या घरीं
सवत आहे
कुणी तरी ! "

५१

## दवाखाना

गाढव म्हणालें,
" कान लांब. "
कुत्रा म्हणाला,
" शेपूट वाकडी. "

डॉक्टर म्हणाला
" सांगतों उपाय :
रोज रात्रीं
खा काकडी ! "

उंट म्हणाला,
" आलें कुबड. "
हत्ती म्हणाला,
" वाढलें वजन. "

डॉक्टर म्हणाला,
" सांगतों उपाय :
रोज करा
शीर्षासन."

५२

## उंदरांचा न्याय

उंदरांमध्यें झाला
खूप तंटा :
कोणीं बांधावी
मांजराला घंटा.

एका उंदरानें
दाखवलीन हिंमत;
बांधलीन घंटा.
केवढी ही गंमत

उंदरांनीं केला
विचार पुरा;
म्हणाले, " आधीं
यालाच मारा !"

५३

## चमत्कार

कधीं ढगाचा
होतो उंट;
कधीं होतो
त्याचा तट्टू
बघतां बघतां
जातो विरून
मग बघणारा
होतो खट्टू.
कधीं ढगाचा
होतो किल्ला;
कधीं होतो
त्याचा हत्ती;
बघतां बघतां
किल्ल्यावरील
चांदोबाची
विझते बत्ती.

५४

# एट्ट लोकांचा देश

## नैसर्गिक रचना

तिबेटाच्या
जरा खाली
हिमालयाच्या
जरा वर
एट्ट लोकांचा
अद्‌भुत देश :
प्रत्येकाजवळ
उडतें घर !
' टिंग ' म्हणता
येते खाली
' टुंग ' म्हणतां
जातें वर ! '

## लोक

त्यांना नसतें
कोपर, ढोपर,
हातपाय असतात
सरळसोट;

त्रिकोणी डोकें,
चौकोनी छाती;
छातीच्या खाली
नसतें पोट.

....पण मनांतली
ऐकतील तान
असे असतात
तिखट कान !



## पोषाख

एट्ट असतात
गोरे, गोरे;
एट्ट असतात
छोटे, छोटे;

पण पुरुषाच्या
पाठीमागे
शेपूट असतें
फार मोठें;

तेंच फिरवून
डोक्यावरती
एट्ट बांधतात
छान फेटे !

## रीतिरिवाज

जेव्हां मुलींचें
करतात बारसें
तेव्हां लावतात
कपाळावर आरसे.

या आरशांचा
उपयोग खूप :
एकमेकींना
दिसतें रूप.

....आणि मुली
भांडल्या तर
हात धरतात
आरशावर !

## नद्या

एटूंच्या देशात
नद्या तीन :
शानी, मानी
आणि दीन.

शानीमध्यें
करतात स्नान,
मानीमधलें
पितात पाणी;

दीनेमधल्या
होडींत बसून
एटू म्हणतात
पऱ्यांचीं गाणीं.

जर चुकली
चाल थोडी
पाण्यामध्यें
बुडते होडी !

## पर्वत

पर्वत आहे
एक तिडा
त्याचें नांव
"चांदपिडा."
अमावास्येला
होतो छोटा,
पौर्णिमेला
होतो मोठा.
मग शिखरावर
घडतें काय ?
चांदोबाचे
टेकतात पाय.
— हें एटूंनीं
पाहिलें तर
नाहीं उडणार
त्यांचें घर !



## उद्योगधंदे

दीनेमधले
सोनमासे
कोणी पकडतात
सोन्यासाठी;

कुणी आपले
उरल्या वेळांत
शहाण्यांच्या शेंड्यांना
मारतात गाठी;

कोणी काढतात
धंदे नवे :
काजवे घालून
करतात दिवे !

## दूधदुभतें

कधी कधी
होतें काय,
स्वर्गामधून
येते गाय.

चांदपिड्यावर
टेकते खूर :
नद्यांना येतो
दुधाचा पूर.

मग एटू
होतात वेडे :
बारा वर्षे
खातात पेढे !

## राजकारण

ज्यांचे दात
असतात चक्क
त्यांनाच मताचा
मिळतो हक्क.

जो वाजवतो
मोठ्याने वाजा
त्यालाच शेवटी
निवडतात राजा.

आणि जी पिते
नाकाने पाणी
तिलाच निवडतात
राजाची राणी.

तरीहि एटूंचे
आहेत पक्ष :
तीन कोटी
सत्तर लक्ष !

## शिक्षण

एटूंच्या देशांत
सत्तांचे खेळ;
मुलांना नसतो
शिकायला वेळ.

म्हातारे देतात
परीक्षा शंभर;
मेल्यानंतर
कळतो नंबर !



## वाङ्मय

जर कोणीं
कविता केली,
प्रथम पुरतात
जमिनीखाली.

पण जुनीशी
झाल्यानंतर
शहाणे करतात
जंतर-मंतर !

मग कवितेंतून
रुजतो वृक्ष;
फुलें येतात
नऊ लक्ष !

## शहाणे

एक शहाणा
म्हणतो, " बघ,
आकाशांतले
मोजतों ढग. "

दुसरा शहाणा
म्हणतो कसें :
" मी पक्ष्यांची
मोजतों पिसें. "

आणि तिसरा
म्हणतो काय,
" मीच उचलतो
माझे पाय. "

शहाण्याने केलें
काम तर
त्याला लागतो
भरावा कर.

## संशोधन

मोरपिसांचे
डोळे असे
लावून आंधळ्यांना
दिसेल कसे

—याचा शोध
लावण्यासाठीं
प्रयोगशाळा
आहे मोठी.

वर्षे झालीं
दहा हजार;
एट्ट करतात
प्रयोग फार.

## न्यायनिवाडा

या देशांतल्या
जज्जासाठी
असते परीक्षा
बिकट मोठी.

सगळ्या देशांतले
सगळे कायदे,
त्यांतले तोटे,
त्यांतले फायदे,

लागतात करावे
तोंडपाठ;
तोवर होतें
वय साठ!

मग कोर्टीमध्ये
करतात काय :
चिठ्या टाकून
लावतात न्याय!



## एट्टूंचा देव

एट्टूंच्या देवाचें
केवढे मोठें पोट!
नाकंनक्टी,
कानंकट्टी,
लाललाल ओठ.

एट्टूंच्या देवाला
पोटावरती डोळा!
एक नाही,
दोन नाही,
असे डोळे सोळा!

## एक ऐतिहासिक लढाइ

मागे एकदा
काय झालें :
एट्टूंवर चिनी
चालून आले.

पण एट्टूंचीच
झाली सर :
सगळी घरें
गेली वर!

चिनी म्हणाले
" पळाला राजा ";
तोच 'टिंग' म्हणून
वाजला बाजा;

डोक्यावर घातली
घरांनी झडप,
सगळे चिनी
झाले गडप!

५५

## परी आणि दगड

परीचा पडला
दगडावर पाय;
दगड म्हणाला,
'आय्, आय्.'

परी म्हणाली,
'तू तर दगड!
तुला का होते
परी जड?'

दगड म्हणाला,
'इथे पहा.'
परीला दिसल्या
जखमा दहा.

तेव्हापासून
सगळ्या परी
चालू लागल्या
अंधांतरी.

५६

## पाव्हणे

परी ग परी,
उघड ना दार;
पाव्हणी आहे
सुंदर फार.

परी ग परी,
आण ना पाणी;
पाव्हणी आली
फुलांची राणी,

परी ग परी,
ठेव ना चहा;
पाव्हणी मागून
पाव्हणे दहा!



५७

## काजव्यांचें गाणें

डोळ्यांत काजवा
गेला ग;
उबव फुलाचा
शेला ग.

हात नको लावूं
दूर नको जावूं
मी पडलें तर
झेला ग.

डोळ्यांत काजवा
गेला ग.

५८

## पऱ्यांच्या गप्पा

"जाईतून गेली,
जुईतून आली,"
"ही काय चालण्याची रीत का झाली?"
"पाचूचं बेट
गाठलंन थेट"
"तिथं तरी त्याची झाली का भेट?"
"सगळीकडे हेंच;
दुसऱ्यांना पेच;"
"धुक्यातनं गेलं की दवाची ठेच!"

५९

## फूलवेडी

एक परी
फूलवेडी,
फुलासारखी
नेसते साडी.

फुलामधून
येते जाते;
फुलासारखीच
छत्री घेते.

विचारीला
नाही मूल;
पाळण्यामध्ये
ठेवते फूल.

६०

## एका परीचा एक डोळा

एका परीचा
एक डोळा
स्वप्नाबरोबर
पळून गेला.

तेव्हापासून
तिला बघ,
दिसू लागले
उलटें जग !

आरसा आहे
सुरेख खूप;
पण उलटें
दिसतें रूप.



६१

## शाप

पऱ्या होतात
शेवटी लठ्ठ,
असे म्हणाला
एक मठ्ठ.

पऱ्यांनी दिला
त्याला शाप :
पुढच्या जन्मीं
झाला साप !

६२

## उनी

एका परीचें
नांव ' उनी '
तिला लागते
उन्हाची फणी !

समुद्राचा
लावते फेस;
ढगावरती
सोडते केस.

झोपते गाढ.
तिला काय !
चांदोबाचा
अडकतो पाय.

६३

## जुईचें गाणें

नाच ग नाच, नाच ग नाच, नाच ग नाच.

कोण ग आला ?
अहेर केला.

चांदोबाच्या मोहरा पांच....नाच ग नाच.

मोगरा आला,
घोगरा झाला.

परीच्या लग्नांत फुलांना जाच....नाच ग नाच.

नाच ग जुई,
नाच ग जाई,

'मी नाय बाई, दुखते टाच '....नाच ग नाच.



६४

## चाफ्याचें गाणें

चाफ्याभवतीं
नाचा ग;
पानाच्या वरचं
वाचा ग.

' तूं जा बोलव....चंद्राला '
' तूं जा बोलव....इंद्राला '
' मला ग बाई....वाटते लाज '
' मी नाय बाई....जाणार आज'

वाटेवरती
कांचा ग;
चाफ्याभवतीं
नाचा ग.

६५

## परी आणि घर

एका मुलाला
दिसली परी;
घातलीन खिशांत,
आणलीन् घरी.

आणि मग
अगदी खुशींत
तिला घेतलीन्
आपल्या कुशींत.

पडलें स्वप्न
भयंकर :
परी चालली
घेऊन घर.

## परी आणि मधमाशी

मधमाशीला
म्हणाली परी;
' सकाळी उठून
करतेस चोरी ! '

मधमाशीला
आला राग,
म्हणाली, ' देते
जिभेला डाग '.

परी पळाली
आपल्या घरांत,
तरी मधमाशी
शिरली आत.

परी चढली
झाडावर,
तरी मधमाशी
आली वर.

फूल म्हणालें
' अग परी,
दड येऊन
माझ्या घरी.'

तेव्हापासून
मधमाशी
फिरत असते
फुलापाशी.



## बहर

एक झाड
फुलेना
वारा लागुन
डुलेना.

मग त्याची
सावली
परीकडे
धावली.

परीकडची
तीट
तिने लावली
नीट.

उपाय नाही
खोटा;
बहर आला
मोठा.



## एकलकोंडी

एक परी
एकलकोंडी
तिची आहे
वेगळी तऱ्हा.
फुलाजवळ
होते फूल;
झऱ्याजवळ
होते झरा.
खारीजवळ
होते खार;
सांबराजवळ
सांबरशिंगी.
पण गर्दी
दिसली तर
लगेच होते
लहान मुंगी.

६९

## परी आणि कविता

चांदोबानें
कविता केली;
हातामधून
पडली खाली.

एका परीनें
झेलली हातात
आणि काढली
चित्रें त्यांत.

मग कवितेत
शिरला सूर;
गेली उडून
दूर, दूर....

७०

## आणि गंमत झाली

पावसाचे पाणी
उभ्यान् प्याली राणी;
तिचा झाला शंख;
त्याला फुटले पंख.

पंखांची सावली
राजाला गावली.
त्यानें चांदणें घेतलें;
सावलीवर ओतलें;

आणि गंमत झाली;
राणी परत आली.



७१

## गुदगुल्या

गुदगुल्या केल्या
गळ्याच्या खाली;
गळ्यांत सोन्याची
कंठी आली.

गुदगुल्या केल्या
तळपायाला;
पायांत चढला
घुंगुरवाळा.

गुदगुल्या केल्या
काखेच्यापाशी;
माणिक-मोत्याच्या
पडल्या राशी.

७२

## गागाचें गाणें

म्याऊ म्याऊ मांजरा
म्याऊ म्याऊ म्याऊ
माझ्या बाळाला घालरे न्हाऊ.

काव काव कावळ्या
काव काव काव
माझ्या बाळाला काजळ लाव.

चिव चिव चिमण्ये
चिव चिव चिव
माझ्या बाळाला आंगडे शीव.

भुक भुक मोत्या
भुक भुक भुक
बाळानें केली कूक कूक.

७३

## नातलग

गिधाडाचा मावळा
त्याला म्हणतात कावळा;

गरुडाचा भाचा
तोच करकोचा;

पोपटाची ताई
तीच मैना ही;

हंसाचा काका
तोच मोर बरं का !

घुबडाला बाई
कोणीच नाही.

७४

## चिमणीचं घर

मुंगीचं घर मातीचं
मातीचं
चिमणीचं घर पातीचं.

गरुडाचं घर हिमतीचं
हिमतीचं
चिमणीचं घर गमतीचं.

माणसाचं घर कौलाचं
कौलाचं
चिमणीचं घर नवलाचं.



७५

## अकलेच्या कांद्याचें गाणें

अकलेचा कांदा पुरला तर
मातीखाली हुरला तर
त्यातुन वेल आला तर
त्यावर चढल्या पाली तर
होईल काय
होईल काय
पाण्यावरती येईल साय.

अकलेचा कांदा चिरला तर
नाकात वास शिरला तर
त्याची भाजी केली तर
खाउन आजी मेली तर
होईल काय
होईल काय
पाण्यावरती येईल साय.

७६

## पतंग गुल्ल करण्याचा मंत्र

सात वेळा सात वारे
नऊ वेळां नऊ दिशा
अक्कडमिट्टी फक्कडमिट्टी
अस्वलाच्या लांब मिशा.
तीन वेळां तीन तेरा
पांच वेळां पांच बोटें
अक्कडमिट्टी फक्कडमिट्टी
माशामधले लांब काटे.
सात वेळां घातला पेच;
नऊ वेळां दिली हूल;
अक्कडमिट्टी फक्कडमिट्टी
तुमचा पतंग झाला गुल्.

७७

## देवमासा आणि डॉक्टर

एका देवमाशानें
गिळली बोट;
डोंगराएवढें
झालें पोट.

देवमासा गेला
डॉक्टरच्या घरी,
म्हणाला, " पोटात
ढाराढुरी." '

डॉक्टरनें कापलें
त्याचें पोट
आणि काढली
बाहेर बोट.

मग डॉक्टर
हसला मिशीत;
देवमासा सुद्धा
आला खुशीत,

आणि म्हणाला
घालीत कोट
" फी साठी
ठेवा बोट."

७८

## मिरचीचें गाणें

( चाल कुटण्याची )

अग अग भटणी
कर माझी चटणी.

( चाल वाटण्याची )

खोबऱ्याची घे वाटी;
....नको पाहू पाठी !

कोथिंबिर घे कोवळी;
...सासू आहे सोवळी !

आण उसना हिंग;
....सासूला आली पेंग !

( चाल कुटण्याची )

अग अग भटणी
कर माझी चटणी.



७९

## ' ट ' ला ' ट '

' ट ' ला ' ट '
' री ' ला ' री '
तुम्ही खा श्रीखंडपुरी.

' ट ' ला ' ट ',
' धी ' ला ' धी '
मी खातो भाकर साधी.

' ट ' ला ' ट ',
' डू ' ला ' डू '
तुम्ही खा सगळे लाडू.

' ट ' ला ' ट ',
' जी ' ला ' जी '
मी खातो पालेभाजी.

' ट ' ला ' ट '
' ठी ' ला ' ठी '
या आतां कुस्तीसाठी !

८०

## छडी मोडण्याचा मंत्र

वेत गेला वेताळा;
हात गेला पाताळा;
गाल गेले गुरोडी;
कान गेले कुरोडी;
सात वेळां डागला;
नऊ वेळां भागला;
वीस वेळां कापला;
तीस वेळां शापला;
आगीमध्यें सारला;
प्रल्हादानें तारला;
डोळे गेले पाण्यात;
राग गेला गाण्यात.

८१

## गुंडू आणि चेंडू

गुंडूच्या स्वप्नांत
आला चेंडू;
आणि म्हणाला,
" ए गुंडू !
मला फुटले
दोन पाय;
आतां तुला
सोडणार नाय. "

मग चेंडूनें
मारली ठोकर;
गुंडू चालला
वर वर.
हात पाय
झाले छोटे;
पोट झालें
खूप मोठें.

गुंडू पोचला
चंद्रापाशी;
चंद्र म्हणाला,
' जिरली खाशी.'
त्यानें मारली
एक ठोकर,
गुंडू पडला
पृथ्वीवर.

छातीमध्यें
झालें धस् ;
आली जाग;
ओं फस्.

८२

## ओळख

मी आहे कांदा
मी आहे कांदा
माझ्या डोक्यावर
फेटाच बांधा.

*

मी आहे भेंडी
मी आहे भेंडी
हल्ली बायकांना
आवडते शेंडी

*

मी आहे मुळा
मी आहे मुळा
मला लावा
पंढरीचा टिळा.

*

मी आहे मेथी
मी आहे मेथी
माझ्या गुणांची
होईल पोथी.

*

मी आहे सुरण
मी आहे सुरण
शंभर बटाट्यांना
आणीन शरण.

*

मी आहे टॉमेटो
मी आहे टॉमेटो
माझा एकट्याचाच
काढतात फोटो.

*

मी आहे फ्लॉवर
मी आहे फ्लॉवर
माझ्याच मालकीचा
राजाबाई टॉवर.

*

मी आहे काकडी
मी आहे काकडी
बरीचशी सरळ
पण थोडीशी वाकडी.

*

मी आहे माठ
मी आहे माठ
  शहाणा कधीही
नसतो ताठ.

*

मी आहे चवळी
मी आहे चवळी
  दिसलें जून
तरी आहे कवळी.

*

मी आहे भोपळा
मी आहे भोपळा
  मी आपला चालणार
तुम्ही आपले पळा.

*

मी आहे लसूण
मी आहे लसूण
  मला खातांना
दाखवा हसून.

*

मी आहे चिंच
मी आहे चिंच
  माझे बूट
माझ्याहून उंच.

*

मी आहे लवंग
मी आहे लवंग
  दिसलें नकटी
तरी नाही सवंग.

*

मी आहे मिरची
मी आहे मिरची
  राखीन लाज
गरिबाच्या घरची.

*

मी आहे लिंबू
मी आहे लिंबू
  माझ्यासाठीं
नका ग थांबू.

*



मी आहे फणस
  बोलतो खरें;
बोचतील काटे,
  पण गावतील गरे.

*

मी आहे बोर
  —गुजराथचा खाऊ—
फार फार गोड
  पण आंत नका पाहू.

*

मी आहे कलिंगड
हाय, हाय, हाय.
  मला जलोदरच
झाला कीं काय ?

*

मी आहे चिक्कू
मनानें उदार;
  नुसत्या नांवामध्यें
नसतें फार.

*

मी आहे आंबा
फळांचा राजा;
  वाजवा रे वाजवा
मोठ्यानें बाजा.

*

## पावसावळ

### पडसें न येण्याचा मंत्र

पेरुमध्यें कुटली कैरी;
बारा बोरें; चौदा वैरी;
चौदा वैरी केले ठार;
वर्फामध्यें झाले गार;
मग कुटली सहा इंच
अक्करमाशी शक्करचिंच;
चिंचेमध्यें कुटला आवळा;
आवळ्यामध्यें कुटला कावळा.
कावळ्यानें केलें कावकाव;
पडसें गेलें; चले जाव !

### पाव्हणी

चिमणीचें घरटें
पावसांत व्हावलें;
तेव्हां कावळयाला
चांगलेंच फावलें.

कावळ्यानें बोलावलें
चिमणीला घरांत
आणि म्हणाला
लाडिक स्वरांत :

" आजचा पाऊस
दिसतो बरा !
चिमुताई, चिमुताई,
स्वैपाक करा. "

### पाणघुळी

पाऊस पडला
टप टप टप;
म्हातारी म्हणाली
" भर रे कप.'

पाऊस पडला
सर सर सर;
म्हातारी म्हणाली
" मडके भर."

पाऊस पडला
रिप रिप रिप;
म्हातारी म्हणाली
" आणते पीप. "

भरली विहिर;
व्हावली कोंड;
तेव्हां म्हातारीनें
उघडलें तोंड !

### वेड्याचें घर

एका वेड्यानें बांधलेन् घर
म्हणाला, " पडेल पाऊस वर ! "

म्हणून त्यावर बांधलेन् दुसरें;
दुसऱ्यावरतीं बांधलेन् तिसरें;

शेवटी म्हणाला, " वा, वा, वा,
घरालासुद्धा रेनकोट हवा. "

## व्यापार

छत्री विकून
घेतली काठी;
ती लागली
माझ्याच पाठी!

काठी विकून
घेतला चाकू;
तो लागला
खिसाच कापू!

चाकू विकून
घेतला बाजा;
त्याने केला
गाजा वाजा!

मग बाजा
टाकला विकून;
चणे खाले
फुकून फुकून.

## घसरगुंडी

पाय घसरून पडला भय्या;
सगळे दूध गेलें वाया.

दुधांत घसरून पडला माळी;
गोरीं फुलें झालीं काळीं.

फुलांत घसरून पडला कवी;
त्यानें केली कविता नवी.

## स्वप्नामध्यें पडला पाऊस

स्वप्नामध्यें पडला पाऊस
पावसामध्यें पडल्या गारा.
आई म्हणाली, " माझ्या दहा, "
बाबा म्हणाले, " माझ्या वारा!"

आजोबाही लावून दांत
पावसामध्ये लागले धावू;
आजी बोलली खाटेवरून
" आपण दोघें कुटून खावू."

मला वाटली भीती फार;
पडसें बिडसें आलें तर!
म्हटलें ओरडून, " याद राखा;
उन्हामध्यें बांधिन घर. "





# यात्रावळ

## तयारी

पंढरपूरच्या
यात्रेसाठी
आम्ही केली
तयारी मोठी.

ट्रंका भरल्या
तब्बल सात;
कपड्यांनी काढले
बाहेर हात.

उदय म्हणाला,
" भाऊ, भाऊ,
विठोबासाठी
घेतलात का खाऊ?"

## संत घड्याळजी

विठोबाच्या देवळांत
म्हातारें घड्याळ;
त्याला नाही
कसलाच ताळ.

बाराही महिने
असतें बंद;
लोक लावतात
त्याला गंध!

पण आरती
म्हटली तर
न चुकता
होतो गजर!

## संत कोल्होबा

पंढरपूरला
निघाला कोल्हा,
त्याच्या मनात
विचार आला :

विठोबाला
करावे खूष;
–आणि चोरलेन्
दहा ऊस.

वाटेत लागली
भूक फार;
तेव्हा सुचला
त्याला विचार :

" आपण खावे
ऊस सात;
विठोबाला
नसतील दात."

## पंढरपुरी पंडित

अलबत अलबत
काय पण गलबत !

जरीचे शीड
सोन्याचें वल्हें;
सुकाणू म्हणतें
' आले, आले. '

कोण हो आले ?
कोण हो आले ?
पंढरपुरचे
पंडित आले !

शिकत शिकत
शिरले आत
दाढीवाले
बेडूक सात.

अलबत अलबत
काय पण गलबत !



## बेडंभट

एका भटजीला
फुटलें शिंग;
लागला गाऊ
' डिंग, डिंग, डिंग. '

शिंग वाढलें
एक फूट;
पोथी विकून
घेतलेन बूट.

शिंग वाढलें
फूट चार;
धाबळी फाडून
केलीन विजार.

एका भटजीला
फुटलें शिंग;
लागला नाचू
' डिंग, डिंग, डिंग.'

## उडाणटप्पू

हप्पु रे हप्पू
उडाणटप्पू

उडाणटप्पू
खातो खूप;
कांदा, भाकर,
लोणी, तूप.

हप्पु रे हप्पू
उडाणटप्पू

उडाणटप्पू
फिरतो देश;
वेगवेगळे
घेतो वेश.

हप्पु रे हप्पू
उडाणटप्पू

उडाणटप्पू
शिरतो आंत;
विठ्ठल आहे
वाट पहात.

## पंढरपुरी शाळा

पंढरपूरच्या
वेशीपाशीं
एक आहे
छोटी शाळा;
सगळी मुलें
आहेत गोरीं;
एक मुलगा
कुट्ट काळा.

रोज करतों
दंगामस्ती;
खोड्या करण्यात
आहे अट्टल.
मास्तर म्हणतात,
" करणार काय.
न जाणो
असेल विठ्ठल ! "

## बिनतिकिटाची यात्रा

काकू चालल्या
यात्रेसाठीं;
डोक्यावरती
तुळस मोठी.

एक चिमणी
बसली वर;
म्हणाली, " माझें
हेंच घर. "

आणि नंतर
म्हणते काय,
" काकू, लवकर
उचला पाय ! "



## पंढरपुरी पेढे

अट्टा मट्टा
चट्ट चट्टा
पंढरपुरचा
काळा कट्टा.

कट्ट्यावरचे
हळवे पेढे
चिवडा खाऊन
झाले वेडे.

वरळत वरळत
गेले दूर
" पोटांत असतें
पंढरपूर ! "

## पंढरपुरी लग्न

टिं टिं टिमकी
ढं ढं ढोल
कडकड ताशा
तडतड बोल.

ई ई सनई
बॅं बॅं बाजा
लग्नासाठी
आला राजा.

लग्नासाठी
आली राणी;
मंडपामध्यें
नव्हते कोणी.

नवरानवरी
होती चूप;
—भटजी मेला
पिऊन तूप !

## पंढरपुरी हट्ट

एका घुमटीला
फुटली मान,
म्हणाली, " आता
हवे कान. "

आणि फुटताच
कान तिला
म्हणाली, " हवे
डूल मला. "

डूल मिळताच
म्हणते कशी,
" साडी हवी
शोभेल अशी. "

आणि मिळताच
शालू नवा
म्हणाली एकदम
" नवरा हवा."

## सही

विठोबापुढें
ठेवून वही
उदयनें मागितली
त्याची सही.

विठोबा म्हणाला
त्याला मजेत,
" देवांना नसतें
लिहायला येत ! "